ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र व संयुक्त प्रशिक्षण केंद्र यांच्या जीर्ण व मोडकळीस आलेल्या इमारतींची पाहणी करुन अहवाल देण्यासाठी नेमण्यात आलेल्या समितीस मुदतवाढ देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

शासन निर्णय क्र. प्रशिक्षण २००८/प्र.क्र.९९/योजना-४

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक : १८ मे, २००९.

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण २००८/प्र.क्र.९९/योजना-४, दिनांक ३०.७.२००८

२) शासन शुध्दीपत्र क्र. प्रशिक्षण २००८/प्र.क्र.९९/योजना-४, दिनांक ८.१०.२००८

**प्रस्तावना :-**

ग्राम विकास विभागामार्फत राज्यात ९ ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्र व १ संयुक्त प्रशिक्षण केंद्र चालविण्यात येते. या प्रशिक्षण केंद्रांपैकी बहुतांशी प्रशिक्षण केंद्रांच्या इमारती जुन्या आहेत. ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, परभणी व पंचायतराज प्रशिक्षण केंद्र, मूल जि.चंद्रपूर या प्रशिक्षण केंद्रांनी मोडकळीस आलेल्या इमारतीची दुरुस्ती करणे आवश्यक असल्याचे व त्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची शासनास विनंती केलेली आहे. बहुतांशी प्रशिक्षण केंद्रांच्या इमारती सन १९६४ पूर्वीच्या असून जुन्या झालेल्या आहेत असे वेळोवेळी घेतलेल्या प्राचार्यांच्या बैठकीत चर्चेमधून निदर्शनास आलेले आहे. त्यानुषंगाने कोणकोणत्या प्रशिक्षण केंद्रांच्या इमारती मोडकळीस आल्या आहेत किंवा त्यांची दुरुस्ती करणे आवश्यक आहे, प्रशिक्षण केंद्रांना कोणत्या पायाभूत सुविधांची आवश्यकता आहे, याची माहिती घेऊन त्यानुसार उपाययोजना करण्याची आवश्यकता आहे. याकरीता सर्व प्रशिक्षण केंद्रांची पाहणी करण्याकरीता व त्यासंदर्भात वस्तुनिष्ठ अभ्यास करुन शासनास अहवाल सादर करण्यासाठी दिनांक ३०.७.२००८ च्या शासन निर्णयान्वये व

दिनांक ८.१०.२००८ च्या शुध्दीपत्रकान्वये समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समितीने तीन महिन्याच्या आत अहवाल शासनास सादर करावयाचा होता. सदर समितीकडून अहवाल प्राप्त न आल्याने सदर समितीस दिनांक ३०.६.२००९ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

वर प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे सदर समितीस दिनांक ३०.६.२००९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सर्व प्रशिक्षण केंद्रांची पाहणी करुन त्यासंदर्भात वस्तुनिष्ठ अभ्यास करुन शासनास दिनांक २०.६.२००९ पर्यंत अहवाल सादर करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक **२००९०६०११४०९४२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( बा. शि. गायकवाड )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय ( सर्व )
२) महासंचालक, यशदा, बाणेर रोड, पुणे.
३) उपायुक्त, ( आस्था)/(विकास), आयुक्त कार्यालय ( सर्व )
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व )
५) उप सचिव ( आस्था), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
६) उप सचिव ( योजना), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
७) श्री. एन.पी. मित्रगोत्री, उपायुक्त (विकास) आयुक्त कार्यालय, पुणे.
८) श्रीमती शालीनी धोटे, सहायक प्राध्यापक, यशदा, पुणे.
९) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, ठाणे, पुणे, सातारा, सोलापूर, जळगांव, लातूर, कोल्हापूर, जालना, बुलढाणा, परभणी, अमरावती, यवतमाळ, नागपूर व चंद्रपूर.
१०) प्राचार्य, पंचायतराज प्रशिक्षण केंद्र, ( सर्व )
११) प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र ( सर्व )११) प्राचार्य, संयुक्त प्रशिक्षण केंद्र ( सर्व )
१२) निवड नस्ती, का.योजना-४.